रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत ॲग्रोटेक कृषी प्रदर्शन-२०२२ मधील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांक :- सपववि-४००२२/९/२०२३-DESKSERICULTURE-CMTD
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- २१ मार्च, २०२४.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक प्रावियो-१०१८/प्र.क्र.१९/ रेशीम कक्ष, दिनांक १८.०४.२०१८.
२) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-१०२३/ प्र.क्र.६५/ अर्थबळ-३, दिनांक १२.०४.२०२३.
३) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक रेशीम/कार्या-८/ॲग्रोवन/ ॲगोएक्सपो/ प्रदर्शनी/तरतूद/ मागणी/२०२२/५७, दिनांक ११.०१.२०२३.
४) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक रेशीम/कार्या-१०/प्रचार व प्रसिध्दी/निधी मागणी/प्रस्ताव/२०२३-२४/९७८, दिनांक ०८.०१.२०२४.
५) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४.

प्रस्तावना :-

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला यांनी आयोजित केलेल्या राज्यस्तरीय ॲग्रोटेक कृषी प्रदर्शनी-२०२२ मध्ये रेशीम संचालनालयातंर्गत रेशीम उद्योगाची जाहिरात प्रसिध्द करण्यात आली होती. याबाबत ॲग्रोटेक कृषी प्रदर्शन २०२२ मध्ये रेशीम उद्योगाची जाहिरातीच्या प्रत्यक्ष खर्चाचे देयक व आवश्यक कागदपत्रासह माहिती संचालक (रेशीम) यांनी दिनांक ०८.०१.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत प्रलंबित देयकाचा खर्च भागविण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली होती. वित्त विभागाने सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत विभागास उपलब्ध असलेल्या तरतूदीतुन निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. सबब, रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील प्रलंबित ॲग्रोटेक कृषी प्रदर्शन २०२२ मधील रेशीम उद्योगाच्या जाहिरातीच्या देयकांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला यांनी आयोजित केलेल्या ॲग्रोटेक कृषी प्रदर्शनी-२०२२ मध्ये रेशीम संचालनालयाच्या जाहिरातीच्या खर्चाची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी ₹ १,००,०००/- (अक्षरी रूपये एक लक्ष फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करताना वित्तीय नियम व वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

४. उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०१) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी (कार्यक्रम) (२८५१६५७४), २६, जाहिरात व प्रसिद्धी" अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०३/२०२४/व्यय-२, दि.१८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२११४१६५४५००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRADDHA DEVEN KOCHAREKAR

Digitally signed by SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC51883E2B27843640CD6C07C96E3E8715CC5BFBE554420E4D68E5F4B112388A, cn=SHRADDHA DEVEN KOCHAREKAR
Date: 2024.03.21 14:26:10 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) उप सचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कोषागार अधिकारी, अकोला.
१०) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, अमरावती.
११) रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय, अकोला.
१२) निवड नस्ती (रेशीम कक्ष).